**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयाच्या अधिनस्त कार्यालयांसाठी नवीन झेरॉक्स मशिन्स खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०२३/प्र.क्र. १९९/प्रशा. २ (रोजगार)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ ऑगस्ट, २०२३

वाचा:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र. क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५
२) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि. १ डिसेंबर, २०१६.
३) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्र. कौविउ-२०२२/प्र. क्र. १२/प्रशा-२, दि. ११ फेब्रुवारी, २०२२.
४) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय यांचे पत्र क्रमांक कौविरोउआ-१/र. व का./न. झेरॉक्स ख./६३५४-५६, दि. २ ऑगस्ट, २०२३

**प्रस्तावना :-**

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांच्या अधिनस्त विभागीय आयुक्तालय, नाशिक व त्यांच्या अधिनस्त जिल्हा कार्यालयांतील तसेच विभागीय आयुक्तालय, औरंगाबाद या कार्यालयांतील झेरॉक्स मशिन्सना बराच कालावधी झाला आहे. सदर मशिन्सचे सुटे भाग बाजारात उपलब्ध होत नाहीत. सदर मशिन्स निर्लेखन करण्यायोग्य असल्याबाबत आवश्यक त्या तांत्रिक अहवालासह संबंधित कार्यालयांनी आयुक्तालयास कळविले असल्याचे आयुक्तालयाने त्यांच्या संदर्भाधीन दि.०२.०८.२०२३ च्या पत्रान्वये कळविले आहे. त्यानुषंगाने आयुक्तालयाच्या अधिनस्त २ विभागीय आयुक्तालय व ५ जिल्हा कार्यालये अशा एकूण ७ कार्यालयांसाठी नवीन झेरॉक्स मशिन खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता व ₹८.७५ लक्ष इतक्या अंदाजित रकमेस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयाच्या अधिनस्त खालील ७ कार्यालयांसाठी नवीन झेरॉक्स मशिन खरेदी करण्यासाठी ₹८.७५ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | एकूण |
|---|---|---|
| १. | कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागीय आयुक्तालय, नाशिक व औरंगाबाद. | २ |
| २. | जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता रोजगार केंद्र, नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव, अहमदनगर. | ५ |
| | एकूण | ७ |

२. उक्त प्रशासकीय मान्यता संदर्भ क्र. ३ येथे नमूद शासन निर्णयान्वये कार्यालयीन खरेदीकरिता विभागाने गठीत केलेल्या समितीची मंजूरी तसेच पुढील अटी व शर्तीस अधीन राहून देण्यात येत आहे:-

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. ०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आयुक्तालयाच्या अधिनस्त २ विभागीय आयुक्तालय व ५ जिल्हा कार्यालये अशा एकूण ७ कार्यालयांसाठी नवीन झेरॉक्स मशिन्स खरेदीसाठीची निविदाप्रक्रीया गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (Government e-Marketplace- GeM) पोर्टलवरुन राबविण्यात यावी.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. ०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील तसेच त्या विभागाने शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठी वेळोवेळी निश्चित केलेल्या कार्यपद्धतीतील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३) निविदाप्रक्रीयाअंती प्राप्त दर बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत तसेच संबंधित पुरवठादाराने झेरॉक्स मशिन्सचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरांपेक्षा जास्त नसल्याबाबत आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांनी खातरजमा करावी.

४) सक्षम प्राधिकारी यांनी खरेदी करण्यात आलेली झेरॉक्स मशिन्स विनावापर पडून राहणार नाहीत तसेच त्याचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घ्यावी.

५) नवीन झेरॉक्स मशिन्स खरेदी केल्यानंतर संबंधित कार्यालयातील जुनी झेरॉक्स मशिन्स कालबाह्य अथवा नादुरुस्त झाली आहेत याबाबत प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावीत व सदर मशिन्स शासकीय कार्यपद्धतीनुसार ३ महिन्यात निर्लेखित करावीत.

३. प्रस्तुत प्रयोजनासाठी येणारा खर्च लेखाशिर्ष, मागणी क्र. झेड ए २, २२३० सेवायोजन कार्यालये (अनिवार्य), ००४ संशोधन, सर्वेक्षण व सांख्यिकी, (०१) रोजगार उपलब्धतेची माहिती, (०१)(०१) रोजगार उपलब्धता माहिती व युवक रोजगार सेवा (अनिवार्य), २२३०११०७-१३ या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १७.०४.२०१५ च्या शासन निर्णयानुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, उपविभाग-दोन, अनुक्रमांक २६ (अ), नियम क्र. ७६ अन्वये

प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८१७१६५६३१६७०३ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRABHAKAR A SANKHE

Digitally signed by PRABHAKAR A SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, pseudonym=11AF006A9B8244D291C83FCA56E433781EE9E76C, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR A SANKHE
Date: 2023.08.17 17:05:06 +05'30'

**(प्रभाकर संखे)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१) मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव
२) वित्त विभाग (अर्थसंकल्प-२०/अर्थसंकल्प -३) व्यय-६
३) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
५) महालेखापाल, महाराष्ट्र -१( लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
६) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा परीक्षा) मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र -२( लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
८) महालेखापाल, महाराष्ट्र -२ (लेखा परीक्षा) नागपूर
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०) सर्व उप आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय,
११) सर्व सहायक आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र,
१२) सर्व कार्यासने (कौशल्य ,रोजगार उद्योजकता व नाविन्यता विभाग) मंत्रालय, मुंबई
१३) निवडनस्ती- कार्यासन प्रशा-२.